वन विषयक कायदयांमध्ये सुधारणा सुचविण्यासाठी समिती गठीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-२०१९/प्र.क्र.१०९/फ-५.**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २३ ऑक्टोबर, २०१९

**प्रस्तावना :-**

सन १९७६ पासून वने विषय भारतीय राज्यघटनेच्या समवर्ती सूचीत समाविष्ट करण्यात आले आहेत. भारतीय वन अधिनियम वगळता सन १९७६ पासून म्हणजेच मागील सुमारे ४४ वर्षात वन विषयक विविध कायद्यात कालानुरुप बदल करण्यात आलेले नाहीत किंवा वनांशी संबंधित कोणतेही नवीन कायदे तयार करण्यात आलेले नाही. कांदळवन, निसर्ग पर्यटन,बांबू विकास, खाजगी वनांमध्ये वृक्ष लागवडीस चालना देणे इ. बाबींसाठी नवीन कायदे तयार करणे तसेच प्रचलित वन कायदयात काही सुधारणा करण्याच्या अनुषंगाने अभ्यास करण्यासाठी एक अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे वन विषयक कायद्यांमध्ये सुधारणा सुचविण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव व पदनाम | समितीतील पद |
|---|---|---|
| १ | प्रधान मुख्य वनसरंक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर | अध्यक्ष |
| २. | प्रधान मुख्य वनसरंक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर | सदस्य |
| ३. | अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक तथा केंद्रस्थ अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर | सदस्य |
| ४. | अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (संधारण), महाराष्ट्र राज्य, नागपूर | सदस्य |
| ५. | अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (संरक्षण), महाराष्ट्र राज्य, नागपूर | सदस्य सचिव |

२. वरील समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील.

१) वन विषयक केंद्र व राज्य शासनाच्या सध्या अस्तित्वात असलेल्या सर्व कायद्यांचा अभ्यास करणे.

२) सदर कायद्यांमध्ये कालानुरुप काही सुधारणा आवश्यक असल्यास तदानुरूप प्रारूप व सर्मथनासह शासनास अहवाल सादर करणे.

३) वन संवर्धनास सहाय्यभूत होतील अशा इतर कायद्यांमध्ये सुधारणा सुचविणे. (उदा. वन विभागामार्फत ५० कोटी वृक्ष लागवडीसारख्या महत्वाकांक्षी कार्यक्रम राबविण्यात येत आहे. सबब ग्रामपंचायत, स्थानिक स्वराज्य संबंधित कायदे, जलसंपदा, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या कायद्यांतर्गत विविध परवानग्या/ मान्यता देतांना वृक्षारोपण सक्तीचे करणे इत्यादी)

४) कांदळवन, निसर्ग पर्यटन, बांबू विकास, खाजगी वनांमध्ये वृक्ष लागवडीस चालना देणे इत्यादी बाबींच्या अनुषंगाने शिफारस करणे.

३. सदर समिती दि. २९ फेब्रुवारी,२०२० पर्यंत अहवाल शासनास सादर करेल. समितीने केलेल्या कामकाजाचा मासिक प्रगती अहवाल प्रधान मुख्य वनसरंक्षक (वनबल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, नागपूर हे शासनास सादर करतील.

४. उपरोक्त प्रयोजनार्थ सेवानिवृत्त वन अधिकारी तसेच कायदेतज्ञ /तज्ञ वकील/तज्ञ न्यायधीश यांच्या सेवा आवश्यकतेनुसार घेण्याची मुभा देण्यात येत आहे.

५. वेगवेगळया कायद्यांसाठी विषयानुरूप वेगवेगळया उपसमित्यांची तयार करून त्यांच्याकडून संबधित कायद्यातील बदलाबाबत कार्य करून घेण्यास मुभा समितीस देण्यात येत आहे.

६. संबधित विषयाबाबत लगतच्या राज्यात कायदेविषयक कोणत्या तरतूदी आहेत, हे अभ्यासून संबधित कायद्यातील सुधारणा करावी.

७. समितीच्या कार्यकक्षांमधील विविध बाबींच्या चर्चेसाठी राज्यस्तरावर कार्यशाळेचे आयोजन करण्यासाठी वित्तीय तरतूद करणे आवश्यक आहे. त्याकरिता आवश्यक वित्तीय तरतूद प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य ,नागपूर यांनी करावी.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१९१०२३१७०१३०६११९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUJAY DEORAO DODAL

Digitally signed by SUJAY DEORAO DODAL
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=a6a471816b9dbfd727f2e5ec4825f4678c8393d846acd1c16b8936c8b3a519c6, ou=REVENUE AND FOREST, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SUJAY DEORAO DODAL
Date: 2019.10.24 15:00:47 +05'30'

**( सुजय दोडल )**
**सह सचिव (वने)**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख ),महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव ), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा केंद्रस्थ अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संरक्षण), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
८. वन विभागातील सर्व कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवडनस्ती फ-५.